# महाराष्ट्र शासन

दुरध्वनी क्र.०२२-२२०४८२४७
ई -मेल-dokh.rfd@maharashtra.gov.in

क्रमांक:-गौखनि-३३/०४१८/प्र.क्र.१७९/ख

महसूल व वन विभाग ,हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- ०६ फेब्रुवारी, २०१९.

**विषय:- गौण खनिज-अहमदनगर**

**सन २०१६-२०१७ या वर्षाकरिता मौजे उक्कलगाव, ता.श्रीरामपूर, जि.अहमदनगर या वाळूगटाच्या लिलावापोटी शासनजमा केलेली रक्कम परत करणेबाबत.**
**मे.साईविजय ट्रेडर्स तर्फे श्री.हेमंत शशिकांत चिटणीस**

**शासन ज्ञापन :-**

जिल्हाधिकारी, अहमदनगर यांना त्यांचे पत्र क्र.गौख/कार्या ४ क/६०७/२०१८, दि.७ एप्रिल,२०१८, क्र.गौख/कार्या ४ क/७९६/२०१८, दि.८ जून,२०१८ व क्र.गौख/कार्या ४ क/१८५९/२०१८, दि.१९ डिसेंबर,२०१८ च्या उपरोक्त विषयावरील पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, अहमदनगर जिल्ह्यातील सन २०१६-२०१७ या वर्षाकरिता मौजे उक्कलगाव, ता.श्रीरामपूर, जि.अहमदनगर हा वाळूगट लिलावधारक श्री.हेमंत शशिकांत चिटणीस यांना २४४९ ब्रास वाळूसाठ्याकरीता रु.४०,२४,११५/- एवढ्या सर्वोच्च बोलीने मंजूर करण्यात होता. लिलावधारकाने लिलावाची १/४ रक्कम रु.१०,०६,०२९/- इतकी रक्कम शासनजमा केली होती.

०२. सरपंच, ग्रामपंचायत उक्कलगांव यांनी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे लिलाव न करणेबाबत रिट याचिका क्र.२५६०/१७ दाखल केली. सदर रिट याचिकेमध्ये मा.उच्च न्यायालयाने दि.२३/२/२०१७ रोजी वाळू भूखंडाबाबत वादी यांनी लिलावाची तक्रार मंत्रीमंडळ उपसमितीकडे सादर करण्याबाबत निर्णय पारित केला. सदर याचिकेमध्ये दिलेल्या निर्णयानुसार मंत्रिमंडळ उपसमितीने दि.१७/५/२०१७ रोजी शासन निर्णय दि.१२/३/२०१३ मधील अटी व शर्ती तसेच पर्यावरण अनुमतीतील अटी व शर्तीच्या अधीन राहून लिलावाची प्रक्रिया पूर्ण करुन वाळू उत्खननास परवानगी देण्याचा निर्णय घेण्यात आला. जिल्हाधिकारी, अहमदनगर यांनी दि.६/६/२०१७ रोजी लिलावधारकास उर्वरित रक्कम १५ दिवसाचे आत जमा करण्यास कळविले होते. तथापि, लिलावधारक यांनी दि.२०/६/२०१७ रोजीच्या पत्रान्वये रिट याचिका क्र.४७२५/२०१७ मधील वाळू गटाचा ताबा देण्यास देण्यात आलेले स्थगिती आदेश व मा.राष्ट्रीय हरित न्यायाधिकरण, नवी दिल्ली यांनी सक्शन पंप वापरास केलेली बंदी व नदीपात्रात असलेले पाणी, या बाबी विचारात घेऊन शासनजमा केलेल्या रक्कमेचा परतावा करण्याकरीता अर्ज केला.

०३. लिलावधारक यांनी शासनजमा केलेली रक्कम परत मिळण्यासाठी मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल रिट याचिका क्र.१४८७७/२०१७ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दि.२०/१२/२०१७ रोजी अंतीम आदेश पारित करुन अर्जदार यांच्या १/४ रक्कम व अनामत रक्कम परत मिळण्याबाबतच्या अर्जावर ४ महिन्यात निर्णय घेणेबाबत आदेश दिले आहेत. तथापि, उक्त कालावधीत रक्कम परत करण्याबाबतचे शासनाकडून आदेश पारित न झाल्याने अर्जदार श्री.हेमंत शशिकांत चिटणीस यांनी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे अवमान याचिका क्र.५१३/२०१८ दाखल केली आहे.

०४. सबब, दि.१२/३/२०१३ च्या शासन निर्णयामधील परिच्छेद क्र. C-१५ येथे “लिलावधारकास कोणत्याही वैध कारणामुळे ग्रामस्थांचा विरोध, न्यायालयीन निर्णय, नैसर्गिक अडीअडचणी, प्रशासकीय यंत्रणांचा विरोध यामुळे उत्खननास किंवा वाहतूकीस किंवा वाळूगटाचा ताबा न दिल्यास, लिलावाची मुदत संपण्यापूर्वी ज्या कालावधीसाठी ठेका रद्द केला जाईल त्या कालावधीसाठी त्याने ज्या किंमतीला लिलाव घेतला त्या रक्कमेच्या प्रमाणात त्याला परतावा देण्यात येईल. अशी रक्कम परत करतांना लिलावाची देकाराची रक्कम लिलावातील अंदाजीत वाळूसाठा व प्रत्यक्ष उत्खनन केलेला वाळूसाठा विचारात घेऊन त्यानुसार परताव्याच्या रक्कमेची परिगणना करण्यात येईल,” ही तरतूद तसेच लिलावधारकास न्यायालयाच्या स्थगिती आदेशामुळे वाळूगटाचा ताबा दिलेला नसल्याने व त्यास लिलावधारक

जबाबदार नसल्याने लिलावधारकाने शासनजमा केलेली १/४ रक्कम रु.१०,०६,०२९/- इतक्या रक्कमेचा परतावा देण्यास वित्त विभाग तसेच शासनाने मंजूरी दिली आहे.

**०५.** सबब, लिलावधारक श्री.हेमंत शशिकांत चिटणीस यांनी लिलावासाठी भरणा केलेली रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर लिलावधारक यांना रुपये १०,०६,०२९/- (रुपये दहा लक्ष सहा हजार एकोणतीस फक्त) इतकी प्रमाणशीर रक्कम अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**०६.** या बाबीवर होणारा खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२-खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीतूमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०७.** सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४७८/ २०१८/ व्यय-०९, दिनांक ३१/१२/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्यांचा संकेतांक २०१९०२०६१७२७०९०२१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajendra Kshirsagar

Digitally signed by Rajendra Kshirsagar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3e673df1a1f6243d932fcb8679fc8cd85d90c61495ae8b4592f8dcc5b8a851a8, serialNumber=aa3985b8c1804418574f1872e9908934b35fbd2a705aaf56c57fbd437a59270d, cn=Rajendra Kshirsagar
Date: 2019.02.06 18:04:06 +05'30'

**( राजेंद्र क्षीरसागर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

जिल्हाधिकारी, अहमदनगर

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) निवडनस्ती (कार्यासन “ख”), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.